**कामगार विभागाच्या अधिनस्त असलेल्या औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय आणि बाष्पके संचालनालयाच्या मागील ३ वर्षापासून शून्य तरतुदी दर्शविलेल्या २ योजना बंद करण्याबाबत...........**

**महाराष्ट्र शासन,**
**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-०७१५/प्र.क्र.५०/कामगार-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- २६ ऑक्टोबर, २०१६.

<u>संदर्भ :</u>-१) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.एसबीई-०५/ २००९/सीआर-२१८/का.१, दिनांक ९/२/२०१०
२) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.एफडीई- ०७/२००९/प्र.क्र.२५७/काम-१ दि.०७/०२/२०११
३) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.एफडीई- ०७/२००९/प्र.क्र.२५६/काम-१ दि.०७/०२/२०११

**<u>प्रस्तावना:-</u>**

मा. मुख्यमंत्री महोदयांकडे दिनांक ०१/०६/२०१५ रोजी आयोजित KRA संदर्भातील बैठकीमध्ये राज्यात एकसारख्या असलेल्या योजना एकत्रित करुन त्या अन्य योजनामध्ये समाविष्ट करुन योजना कमी करण्याबाबत सूचना देण्यात आलेल्या आहेत.

२. नाशिक महसूल विकास विभाग कार्यक्रमांतर्गत दि. २२ व २३ जुलै,२००९ रोजी नाशिक येथे झालेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय आणि बाष्पके संचालनालय यांच्या नाशिक येथील विभागीय कार्यालयासाठी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने (MIDC) बांधलेल्या, “उद्योग भवन” या इमारतीमध्ये कायम स्वरुपी जागा विकत घेण्याच्या आणि त्यासाठी लागणारा निधी सन २०१०-११ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्याच्या प्रस्तावास, मंत्रिमंडळाने मान्यता दिलेली होती. त्यानुषंगाने संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता दिलेली आहे.

३. तद्नंतर औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयास, नाशिक येथील विभागीय कार्यालयासाठी सातपूर येथे महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने बांधलेल्या “उद्योग भवन” या इमारतीमध्ये जागा घेण्यासाठी रु.५६,००,०००/- लाख ( रु. छप्पन्न लाख फक्त) इतका निधी मंजूर करुन खर्च करण्यास व सदर निधी सन २०१०-११ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यास संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे.

४. तसेच, बाष्पके संचालनालयास, नाशिक येथील विभागीय कार्यालयासाठी सातपूर येथे महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने बांधलेल्या "उद्योग भवन" या इमारतीमध्ये जागा घेण्यासाठी रु.३२,००,०००/- (रु.बत्तीस लाख फक्त) इतका निधी मंजूर करुन खर्च करण्यास व सदर निधी सन २०१०-११ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यास संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे.

५. औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय आणि बाष्पके संचालनालय यांची नाशिक येथील विभागीय कार्यालये, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने (MIDC) बांधलेल्या, "उद्योग भवन" या इमारतीमध्ये कार्यान्वित झालेली असल्यामुळे सदर योजनेचा हेतू आता साध्य झालेला आहे. त्यामुळे मागील ३ वर्षात सदर योजने करिता तरतूद करण्यात आलेली नाही. या पार्श्वभूमीवर सदर योजना बंद करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णयः-</u>**

योजनेचा हेतू आता साध्य झाला असल्यामुळे उद्योग,ऊर्जा व कामगार विभागाकडून सुरु करण्यात आलेल्या खालील दोन योजना या शासन निर्णयान्वये बंद करण्यात येत आहेत:-

| अ.क्र. | मागणी क्र. व लेखाशीर्ष | योजनेचा विषय | योजना बंद करण्याची कारणे |
|---|---|---|---|
| १ | के-९, ४२५०, इतर सामाजिक सेवावरील भांडवली खर्च, (००)(०३)सह संचालक, सुरक्षा व आरोग्य, नाशिक यांच्याकरीता उद्योग भवन येथे तयार जागा खरेदी करणे (४२५० ०५८२) ६०, इतर भांडवली खर्च | औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयाच्या नाशिक कार्यालयाकरीता महाराष्ट्र राज्य औद्योगिक महामंडळाच्या "उद्योग भवन" सातपूर, नाशिक येथील इमारतीत जागा खरेदी करणे. | सदर योजनेचा हेतू साध्य झाला आहे. मागील ३ वर्षात त्याकरिता तरतूद करण्यात आलेली नाही. |
| २ | के-९, ४२५०, इतर सामाजिक सेवावरील भांडवली खर्च,(००)(०४)सह संचालक, बाष्पके, नाशिक यांच्या कार्यालयासाठी जागा खरेदी करणे (४२५० ०५९१) ६०, इतर भांडवली खर्च | बाष्पके संचालनालयाच्या नाशिक कार्यालयाकरीता महाराष्ट्र राज्य औद्योगिक महामंडळाच्या "उद्योग भवन" सातपूर, नाशिक येथील इमारतीत जागा खरेदी करणे. | सदर योजनेचा हेतू साध्य झाला आहे. मागील ३ वर्षात त्याकरिता तरतूद करण्यात आलेली नाही. |

सदर योजना बंद करण्यात आल्यामुळे नियोजन विभागाच्या योजना माहिती प्रणालीतून **(MP-SIMS)** सदर योजना वगळण्याची कार्यवाही नियोजन विभागाने करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१०२८१०४८४९१८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Jayashree Anand Khavnekar

Digitally signed by Jayashree Anand Khavnekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry, Energy And Labour, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=22d1b0e58c6079fa0b088676a5f35c7244813abec2cefa8c48327143ac8307f2, cn=Jayashree Anand Khavnekar
Date: 2016.10.28 10:54:32 +05'30'

**( ज.आ. खवणेकर)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
५) संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, कामगार भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई.
६) प्रभारी संचालक, बाष्पके संचालनालय, कामगार भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई.
७) सर्व अपर/सह संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, (द्वारा संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय,)
८) सर्व सह संचालक, बाष्पके (द्वारा प्रभारी संचालक, बाष्पके संचालनालय)
९) नियोजन विभाग, कार्यासन १४११/१४६१
१०) वित्त विभाग, अर्थसंकल्प-१९/व्यय-१६
११) कार्यासन प्रशासन-१, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,
१२) मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
१३) प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक.
१४) निवड नस्ती (कामगार-१)